राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत ग्रामपंचायत वावंढळ ता. खालापूर जिल्हा रायगड येथील वावंढळ तलावास प्रशासकीय मान्यता व निधी वितरित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रासयो-२०२२/प्र.क्र.७७ /आस्थापना अ**
नवीन प्रशासन भवन,१५ वा मजला,हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २९ मार्च,२०२२

**वाचा :-**

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रायगड, जि.रायगड ,यांच्याकडून प्राप्त प्रस्ताव.

२) दिनांक १७.१२.२०१८ रोजीच्या सुकाणू समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

३) दि.१७.०३.२०२२ रोजीच्या सुकाणू समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

४) पर्यावरण विभाग शासन निर्णय क्र. शासन निर्णय क्रमांकः रासयो-२०१९/प्र.क्र.१४१ /तां.क.२, दि.२७.०८.२०१९

**प्रस्तावना –**

राज्यातील तलाव, सरोवरे व मोठे जलाशय यांचे पर्यावरणीयदृष्टया संवर्धन करण्यासाठी राज्य शासनाने राज्य योजनेंतर्गत राज्य सरोवर संवर्धन योजना सन २००६-०७ या आर्थिक वर्षापासून सुरु केली आहे. या योजनेंतर्गत सर्वसाधारणपणे खालील कामांचा समावेश होतो.

१. तलावाच्या पाण्याचे प्रदूषण करणारे स्त्रोत निश्चित करुन प्रदुषण रोखण्यासाठी उपाययोजना करणे.
२. तलावात साचलेला आवश्यक घातक व ऑरगॅनीक गाळ काढणे.
३. तलावाची गुणवत्ता टिकविण्यासाठी,
अ. तलावातील अनावश्यक व उपद्रवी वनस्पती नष्ट करुन त्यांची वाढ नियंत्रणात आणण्यासाठी उपाययोजना करणे.
ब. तलावातील जैविक प्रक्रियेव्दारे तलावातील पाण्याची गुणवत्ता सुधारणे.
क. किनारा सौंदर्यीकरण, हरित पटटा विकसित करणे, कुंपण घालणे, मनोरंजनासाठी बालोद्यान, नौकाविहार, कमी किंमतीची स्वच्छतागृहे इ.
४. जनसहभाग व जनजागृतीसाठी कार्यक्रम तसेच प्रदुषण रोखण्यासाठी स्थानिक परिस्थितीनुसार करावयाच्या उपाययोजना.

राज्य सरोवर संवर्धन योजनेतंर्गत गठीत सुकाणू समितीच्या दिनांक १७.१२.२०१८ रोजीच्या बैठकीमध्ये घेण्यात आलेल्या निर्णयानूसार वांवढळ तलाव, वावंढळ ता. खालापुर, जि. रायगड यांना राज्य शासनाच्या हिश्यातील निधी वितरीत करण्याचा शासन निर्णय दिनांक २७.८.२०१९ रोजी निर्गमित करण्यात आला होता. (पृ /पवि) त्यानुषंगाने दि१०.०९.२०१९ अधिदान व लेखा कार्यालयास देयक सादर करण्यात आले होते. दिनांक ११.९.२०१९ रोजीच्या अधिदान व लेखा कार्यालयाच्या पत्रान्वये सदर तलावाच्या दिनांक २७ ऑगस्ट २०१९ शासन निर्णयामध्ये आक्षेप नोंदविले होते. दरम्यानच्या काळात कोरोनाच्या पार्श्वभूमीवर सदर आक्षेपाची पूर्तता करता आली नाही.

दि. २४.०२.२०२२ रोजीच्या आयोजित सूकाणू समितीच्या बैठकीत वावंडळ तलावाच्या प्रस्तावास सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात निधी वितरित करण्यास मंजूरी देण्यात आली. वावंडळ तलावास सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात निधी वितरित करण्याबात शासन स्तरावर मंजूरी दिलेली आहे. सबब, वावंढळ तलाव संवर्धनासाठी निधी वितरित करण्याबाबतचा दिनांक २७.८.२०१९ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करून प्रस्तूत शासन निर्णयाद्वारे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रायगड, जि.रायगड यांच्यामार्फत सादर ग्रामपंचायत वावंढळ ता. खालापूर, जि. रायगड येथील वावंढळ तलावाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता व प्रथम हफ्त्यापोटी निधी मुक्त करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्या अनुषंगाने शासन पुढील निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

१. राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रायगड मार्फत सादर ग्रामपंचायत वावंढळ ता. खालापूर जि. रायगड येथील वावंढळ तलावाचे पर्यावरणीयदृष्टया संवर्धनासाठी सविस्तर प्रकल्प अहवालानुसार सोबत जोडलेल्या " प्रपत्र अ" मध्ये नमूद केलेली कामे पूर्ण करण्यासाठी एकूण रुपये २,४७,३१,८०६/- (रुपये दोन कोटी सत्तेचाळीस लक्ष एकतीस हजार आठशे सहा फक्त) इतक्या रकमेस खालील अटी व सोबत जोडलेल्या " प्रपत्र -ब" मधील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर मंजूर एकूण रकमेपैकी ९०% हिस्सा म्हणून राज्य शासन व १० % हिस्सा म्हणून ग्रामपंचायत वावंढळ यांनी जिल्हा परिषद रायगड, जि. रायगड यांना निधी उपलब्ध करुन देईल. सदर योजनेचा वित्तीय आकृतीबंध पुढीलप्रमाणे राहील.

| अ.क्र | हिस्सा | मंजूर निधी (रुपये) | अक्षरी मंजूर निधी |
|---|---|---|---|
| १ | ९०% राज्य हिस्सा | २,२२,५८,६२५.४० | रु. दोन कोटी बावीस लक्ष अठ्ठावन्न हजार सहाशे पंचवीस पैसे चाळीस फक्त |
| २ | १०% ग्रामपंचयात हिस्सा | २४,७३,१८०.६० | रु. चोवीस लक्ष त्र्याहत्तर हजार एकशे ऐंशी पैसे साठ फक्त |
| | एकूण | **२,४७,३१,८०६.००** | रु. दोन कोटी सत्तेचाळीस लक्ष एकतीस हजार आठशे सहा फक्त |

अ. सविस्तर अहवालात नमूद केल्यानुसार तलाव पाण्याचे प्रदूषण होत असलेल्या पाणलोट क्षेत्रातील अनधिकृत वाहती प्रथमत: हटवून तदनंतरच इतर कामे राबविण्यात यावी

ब. एकूण मंजूर निधीपैकी ग्रामपंचायतीचा हिस्सा हा राज्य शासनामार्फत निर्गमित केलेल्या हिश्श्याच्या १०% याप्रमाणे प्रथमत: बँक खात्यात जमा करण्यात यावा.

क. उत्सवांच्या कालावधीत निर्माल्य वा मूर्त्यांचे विसर्जन वा तत्सम बाबींमुळे तलावातील पाण्याचे प्रदुषण होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

२. राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत वावंढळ ता. खालापूर जिल्हा रायगड येथील वावंढळ तलावाचे पर्यावरणीयदृष्टया संवर्धन करण्यासाठी राज्य हिश्श्यापोटी देय एकूण रुपये २,२२,५८,६२५.४० (रुपये दोन कोटी बावीस लक्ष अठ्ठावन्न हजार सहाशे पंचवीस पैसे चाळीस फक्त) पैकी प्रथम हप्त्यापोटी म्हणून रु. १,११,००,०००/- (रुपये एक कोटी अकरा लक्ष फक्त) एवढी रक्कम यांना वितरित करण्यास शासन निर्णयातील "प्रपत्र -ब" मधील सर्व मार्गदर्शक तत्वे, अटी व शर्तीच्या अधीन राहून या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड यांना अदा करावयाची रुपये रुपये १,११,००,०००/- (रुपये एक कोटी अकरा लक्ष फक्त) इतकी रक्कम अधिदान व लेखाधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्रीम. शिल्पा चं. शिर्के,कार्यासन अधिकारी, पर्यावरण विभाग व नियंत्रक अधिकारी म्हणून श्री. सु. कि. निकम, सह सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय यांना घोषित करण्यात येत आहे. त्यांनी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड यांना रुपये १,११,००,०००/- (रुपये एक कोटी अकरा लक्ष फक्त) इतकी रक्कम अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून स्वतंत्र धनादेशाव्दारे वितरित करण्याची कार्यवाही करावी.

४. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र .यू-४, ३४३५ परिस्थितिकी व पर्यावरण ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण, १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना -राज्य योजनांतर्गत योजना, (०२),पर्यावरण प्रतिबंध, (०२) (०७), राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना, (३४३५ ०१८२), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या मुख्य लेखाशिर्षाखाली २०२१-२२ या अर्थसंकल्पित वर्षात उपलब्ध मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली वर्गीकृत करण्यात यावा.

५. प्रस्तूत शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२१/प्रक्र.४८/अर्थ-३, दिनांक १४ ऑक्टोबर २०२१ व दिनांक ३ फेब्रूवारी २०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. तसेच प्रमाणित करण्यात येते की, दिनांक २४.०६.२०२१ रोजीच्या शासन निर्णयातील परिशिष्टातील अनु.क्र. २ व ९ मधील अटींची पुर्तता होत आहे, तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्रक्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१ रोजीच्या शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार वितरित करण्यात येत आहे.

I) वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्रक्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून २०२१ च्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मधील ३१ वेतनेतर सहायक अनुदाने या बाबीखालील खर्च करण्यात विभागाला अधिकारी प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील नमूद अटींची पूर्तता करण्यात आली आहे.

II) वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्रक्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून २०२१च्या परिशिष्टातील अनुक्रमांक १,३,५,६,७ व ८ या प्रकरणी लागू नाही. तसेच सदर परिशिष्टातील अनुक्रमांक ४ बाबत नमूद करण्यात येते की ही योजना केंद्र पुरस्कृत बाहय सहाय्यित योजना नाही.

III) वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्रक्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून २०२१ च्या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक २ च्या अनुषंगाने नमूद करण्यात येत की, सदर योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये कसलाही बदल करण्यात आलेला नाही. तसेच परिशिष्टातील अ.क्र.९ संदर्भातील तपासणी सूचीमधील अनुक्रमांक १,२,३ व ४ मध्ये नमूद करण्यात आलेल्या अटींची पूर्तता होत आहे. तसेच सदर अनुक्रमांक ९ संदर्भातील तपासणी सूचीमधील अनुक्रमांक ५ ते १० या प्रकरणी लागू नाही.

६. या शिवाय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा ५ दिनांक १०.०५.२०१६ अन्वये परिच्छेद क्र.४ मधील खालील बाबींची पूर्तता होत आहे.

१. विभागास प्रदान वित्तीय अधिकाराबाबत वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थंस २०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३ दिनांक २.४.२०१८ मधील परिच्छेद क्र.६ (अ) नुसार रु.५ कोटी पर्यंतच्या अनावर्ती योजनेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना आहेत.

२. ग्रामपंचायत वावंढळ तालुका खालापूर, जि. रायगड, येथील वावंढळ तलावाच्या प्रस्तावासाठी रु.२,४७,३१,८०६/- (रु. दोन कोटी सत्तेचाळीस लक्ष एकतीस हजार आठशे सहा फक्त ) एवढया निधीमधील राज्य हिस्सा रुपये २,२२,५८,६२५.४० (रुपये दोन कोटी बावीस लक्ष अठ्ठावन्न हजार सहाशे पंचवीस व पैसे चाळीस फक्त) पैकी प्रथम हप्त्यापोटी म्हणून रुपये १,११,००,०००/- (रुपये एक कोटी अकरा लक्ष फक्त) इतका निधी प्रथम हप्त्यापोटी प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात येत आहे.

३. सदर तलावास मागील तीन महिन्यात कोणताही निधी मुक्त करण्यात आलेला नाही.

४. "मागणी क्र.यु-४, ३४३५-परिस्थितिकी व पर्यावरण, ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण,१०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०२) पर्यावरण प्रतिबंध (०२) (०७), राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५ ०१८२), ३१,सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)"या मुख्य लेखाशिर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५. जिल्हा परिषद रायगड, जिल्हा रायगड यांच्याकडून पर्यावरण विभागास कोणतेही येणे बाकी नाही.

६. तसेच उपरोक्त शासन निर्णयाच्या "अ "मधील परिच्छेदातील ६, ७, ८, ९ या बाबी लागू नाहीत.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या संमतीने,वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. ८८/२०२२/व्यय-१६, दि.२५.०३.२०२२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharshtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३२९१२४८५३२५०४ असा आहे .हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: CN = SURYAKANT KISAN NIKAM, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT
Date: 2022.03.29 12:49:42 +05'30'

**( सु.कि.निकम ) ,**
**सह सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र १/२,मंबई/ नागपूर.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड
३. आयुक्त तथा संचालक नगरपरिषद संचालनालय, मुंबई.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मंबई.
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७. खाजगी सचिव, मा.मंत्री, पर्यावरण व वातावरणीय बदल, मंत्रालय,मुंबई.
८. खाजगी सचिव, मा.राज्यमंत्री, पर्यावरण व वातावरणीय बदल, मंत्रालय,मुंबई.
९. स्वीय सहायक, प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मंबई.
१०. स्वीय सहायक प्रधान सचिव, नगरविकास विभाग, मंत्रालय, मंबई.

११. वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१२. नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.
१३. रोखशाखा, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवडनस्ती.

शासन निर्णय क्र.रासयो-२०२२/प्र.क्र.७७/आस्थापना अ, दिनांक २९ मार्च २०२२ सोबतचे सहपत्र

प्रपत्र-अ”

ग्रामपंचायत वावंढळ ता. खालापूर जि. रायगड येथील वांवढळ तलाव

| Sr. No | Particulars | Amount |
|---|---|---|
| | **A) Core work** | |
| 1 | Cleaning Cutting thorny shrubs bushes, grass | 43951.34 |
| 2 | Excavation in all kinds of soil | 50000.00 |
| 3 | Dewatering | 50000.00 |
| 4 | Retaining wall construction and steps as per drawing | 2,32,23,084.60 |
| 5 | 900 Mm Dia RCC Pipe for Outlet | 34,665.00 |
| | **Total Core Works (A)** | **2,34,01,700.94** |
| | **B) Non-Core Work** | |
| 1 | Paver Block around the lake as per Drawing | 10,10,483.94 |
| 2 | Providing Solar System | 3,19,621.20 |
| | **Total Non-Core Works (B)** | **13,30,105.14** |
| | **Total Core + Non-Core Work (A+B)** | **2,47,31,806.08** |
| | **Say (Rs. two crore forty seven lacs thirty one thousands eight hundred six only )** | **2,47,31,806.00** |

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: CN = SURYAKANT KISAN NIKAM, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT
Date: 2022.03.29 12:49:58 +05'30'

सु.कि.निकम

सह सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग

महाराष्ट्र शासन

**शासन निर्णय क्र.रासयो-२०२२/प्र.क्र.७७/आस्थापना अ, दिनांक २९ मार्च २०२२ सोबतचे सहपत्र**

**"प्रपत्र-ब"**

राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत ग्रामपंचायत वावंढळ, ता. खालापूर, जिल्हा रायगड येथील वावंढळ तलावाच्या संवर्धन कामांसाठीच्या अटी व शर्ती

१. प्रपत्र -अ" मधील नमूद कामांना प्रथमत: तांत्रिक मंजूरी प्राप्त करुन घेण्यात यावी. योजनेच्या प्रत्येक टप्प्यात हाती घेण्यात येणा-या कामाचे मंजूर तांत्रिक आराखडे, अंदाजपत्रके, नकाशे, संकल्पचित्रे इ. शासनाकडे काम सुरु करण्यापूर्वी सादर करणे बंधनकारक असेल. शासनास उपरोक्त माहिती सादर केल्यानंतरच कामे सुरु करण्यात यावीत. हाती घेण्यात यावयाच्या ("प्रपत्र-अ" मधील नमूद कामे) कामासंबंधित तलावाच्या सद्यस्थितीची छायाचित्रे घेण्यात यावी. तसेच व्हीडीओ रेकॉडिंग करण्यात यावे. कामांच्या प्रगतीनुसार दर दोन महिन्यांनी याप्रकारे छायाचित्रण करण्यात यावे.

२. तलाव संवर्धन क्षेत्रात तज्ञ व कामाचा अनुभव असलेली तसेच "प्रपत्र-अ" नुसार मंजूर खर्चाच्या बाबी संबधीत तज्ञ व पुरेसे तांत्रिक मनुष्यबळ असलेली संस्था /शासकीय प्राधिकरण/मंडळ यांची प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्था म्हणून मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रायगड यांनी विहित पध्दतीने नियुक्ती करावी. ही संस्था "प्रपत्र-अ" नुसार मंजूर खर्चाच्या बाबींचे स्थानिक डी. एस. आर. प्रमाणे खर्चाचे अंदाज, कामाचे आराखडे तयार करणे व तपासणे कामाची गुणवत्ता राखणे, सर्व कामे विहित कालमर्यादेत पूर्ण करणे याबाबत वेळोवेळी समन्वय करेल. जिल्हा परीषदेने प्रकल्पासाठी तांत्रिक मनुष्यबळ तयार होण्यासाठी या संस्थेचा उपयोग करावा.

३. शासनाने वितरित केलेल्या निधीच्या विहित प्रमाणात मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड यांनी त्यांचा अनुज्ञेय हिस्सा खात्यात जमा करावा. सदर हिस्सा प्रकल्पावर खर्च केल्याशिवाय तसेच, प्रकल्पांतर्गत होणा-या कामांचे गुणवत्ता लेखापरिक्षण केल्याशिवाय पुढील हप्ता मुक्त करण्यात येणार नाही.

४. कामे विहित कालावधीत पूर्ण करण्याची व कामाची गुणवत्ता राखण्याची संपूर्ण जबाबदारी ही मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रायगड यांची असेल. सदर प्रकल्पाच्या कामासाठी लागणारा निधी खर्च करताना मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रायगड यांच्या देखरेखेखाली करण्यात यावा.

५. प्रकल्पाची यथायोग्य अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीकोनातून प्रकल्प अंमलबजावणी समितीची मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रायगड यांच्या अध्यक्षतेखाली स्थापना करण्यात यावी. या समितीत जिल्हा परिषदेतील संबंधित अधिकारी, कर्मचारी, पर्यावरण विषयक तज्ञ, उपरोक्त प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्थेचे प्रतिनिधी यांच्यासह आवश्यक वाटतील अशा प्रतिनिधींचा समावेश करण्यात यावा. ही समिती प्रकल्पांतर्गत होत असलेल्या सर्व कामकाजाचे सनियंत्रण करेल व कामांच्या गुणवत्तेवर नियंत्रण ठेवेल. सदर समितीची आढावा बैठक दर महिन्याला अयोजित करण्यात यावी.

६. प्रकल्प पूर्ण झाल्यावरही प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्थेच्या मदतीशिवाय तलावाचे संवर्धन होणे गरजेचे असल्याने योजनेची कामे पूर्ण झाल्यावरही ही समिती बैठका आयोजित करेल. ही समिती

भौतिक बाबींची देखभाल, प्रकल्पांपासून मिळणारे उत्पन्न, प्रकल्प संवर्धनासाठी उपाययोजना व खर्च याबाबत आढावा घेत राहील.

७. काम पूर्ण झाल्यावर किमान पुढील १० वर्षापर्यंत तलावाची देखभाल व दुरुस्ती ग्रामपंचायतीने स्वखर्चाने करावयाची आहे. तसेच जिल्हा परिषद प्रकल्प अंमलबजावणी समितीचा अहवाल प्रत्येक ६ महिन्यांनी शासनाकडे पाठविण्याची व्यवस्था करेल.

८. तलावाच्या पाण्याची गुणवत्ता चालू महिन्यापासून पुढे प्रत्येक महिन्याला तपासण्यात यावी. पाण्याची गुणवत्ता तपासण्यासाठी या क्षेत्रातील तज्ञ प्रयोगशाळेची /संस्थेची /मंडळाची नियुक्ती करण्यात यावी. दर महिन्याचा पाण्याच्या गुणवत्तेचा अहवाल सदर संस्था प्रकल्प सनियंत्रण समितीस व पर्यावरण विभागास दर तीन महिन्यांनी सादर करेल.

९. उपरोक्त मुद्यानुसार केलेल्या कार्यवाही प्रमाणे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रायगड हे शासनास दर तीन महिन्याला खालील अहवाल सादर करतील.

अ. मंजूर कामांचा भौतिक प्रगती अहवाल
ब. पाण्याच्या गुणवत्ता अहवालाच्या प्रती
क .प्रकल्प सनियंत्रण समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.
ड खर्चाचे प्रत्येक तिमाहीचे उपयोगिता प्रमाणपत्र

१०. सदर अहवाल सादर केल्याशिवाय कामाच्या पुढील टप्प्यातील निधी उपलब्ध करुन देण्यात येणार नाही. तसेच आर्थिक वर्षाचे उपयोगिता प्रमाणपत्र वर्ष संपल्यानंतर एप्रिलच्या १० तारखेपर्यंत पर्यावरण विभागास सादर करावे. उपरोक्त मंजूर योजनेसाठी निधी उपलब्धतेनुसार अनुदान मुक्त करण्यात येईल.

११. योजनेंतर्गत मंजूर विशिष्ट कामासाठी अदा केलेली वा मान्य केलेली रक्कम त्याच कामासाठी राज्य शासनाने घालून दिलेल्या अटी व शर्ती प्रमाणे व विहित कालमर्यादेत मान्य केलेल्या खर्चाच्या मर्यादेत खर्च करणे आवश्यक आहे. हा निधी इतर दुस-या कोणत्याही कामासाठी वा जिल्हा परिषदेच्या कामासाठी वापरता येणार नाही किंवा वळता करता येणार नाही. विशिष्ट कामासाठी मान्य केलेल्या खर्चापेक्षा जास्त खर्च झाल्यास त्याची जबाबदारी संबंधित जिल्हा परिषद, रायगड यांची असेल.

१२. या योजनेंतर्गत प्राप्त होणारा निधी हा राष्ट्रीयकृत बँकेत स्वतंत्र खाते उघडून त्या अंतर्गत जमा करावा व बँकेत ठेवलेल्या निधीवर मिळणारे व्याज याच निधीत जमा करावे. या निधीच्या उपयोगितेवर नियंत्रण राहण्यासाठी खात्याचे संचालन मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद रायगड यांच्याव्दारे करण्यात यावे. उपयोगिता प्रमाणपत्र सादर करतेवेळी बँकेतील या खात्यावर झालेल्या व्यवहाराच्या नोंदी दर्शविणा-या पासबुकाची साक्षंकित प्रत सोबत जोडण्यात यावी.

१३. योजना पूर्ण झाल्यावर या योजनेंतर्गत निर्माण झालेल्या मालमत्तेपासून किंवा सोयीसुविधांपासून मिळणारे उत्पन्न हे या योजनेसाठी उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यातच जमा करण्यात यावे. या उत्पन्नातून तलाव संवर्धनासाठी अतिरिक्त कामे राज्य शासनाच्या पर्यावरण विभागाच्या अनुमतीने हाती

घेता येतील. मात्र तलावाच्या संवर्धनाच्या कामाव्यतिरिक्त इतर कोणत्याही कामासाठी हा महसूली निधी वापरता येणार नाही.

१४. मंजूर कामे शासन आदेशाच्या दिनांकापासून/धनादेशाच्या दिनांकापासून २४ महिन्यात किंवा तत्पूर्वी पूर्ण करावयाची आहेत.

१५. मंजूर बाबीतील खर्चामध्ये बचत झाल्यास बचत झालेला निधी योजनेतीलच दुस-या उपांगासाठी राज्य शासनाच्या पर्यावरण विभागाच्या परवानगीने वापरता येईल.

१६. राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत निर्माण केलेल्या यंत्रणेच्या देखभाल व दुरुस्तीचा खर्च योजना कार्यान्वित झाल्यानंतर संबंधीत ग्रामपंचायतीने स्वत:च्या निधीतून भागवावयाचा आहे.

१७. योजनेंतर्गत खर्च करण्यात येणा-या रकमेचे लेखे प्रचलित लेखा संहितेनुसारच ठेवण्यात यावेत व त्याचे लेखापरिक्षण स्थानिक निधी व लेखापाल यांच्याव्दारे करण्यात यावे व त्याचा अहवाल पर्यावरण विभागास पाठविण्यात यावा. तसेच प्रत्येक आर्थिक वर्षा अखेर झालेलया खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र संबंधीत महालेखापाल कार्यालयास पाठविण्याची जबाबदारी नगर परिषदेची राहील.

१८ तलावांच्या कामांच्या प्रगतीच्या अहवालाची तसेच खर्चाच्या विवरणपत्राची पर्यावरण विभागाच्या सक्षम अधिका-यांकडून तपसणी करण्यात येईल व तपासणीच्या वेळी जिल्हा परिषदेने आवश्यक ती सर्व कागदपत्रे उपलब्ध करुन देणे बंधनकारक असेल.

१९. संबंधीत ग्रामपंचायतीच्या हद्दीतील हॉटेलमधून/लोकवस्तीतून/वाणिज्यिक आस्थापनेतून निघणारे सांडपाणी तलावात जाणार नाही याची जबाबदारी ग्रामपंचायतीची असेल.

२०. योजनेवरील कामासाठी मान्यता प्राप्त झालेल्या रक्कमेपेक्षा अधिक खर्च झालेली रक्कम शासनाकडून उपलब्ध होणार नाही. या कामासाठी शासनाने अदा केलेली रक्कम जर त्या कामावर घालून दिलेल्या विविक्षित वेळेमध्ये खर्च होऊ शकत नसेल तर त्यास राज्य शासनाच्या पर्यावरण विभागाची पूर्वपरवानगी घेणे आवश्यक असेल.

२१.योजनेवरील कामासाठी अदा केलेली रक्कम योग्य रितीने वापरली जात नाही किंवा कामाची योग्य ती प्रगती होत नाही असे शासनाच्या निदर्शनास आल्यास शासन कोणत्याही क्षणी अशा कामांची प्रशासकीय मान्यता रद्दबातल करु शकेल.

२२) राज्य शासनाच्या पर्यावरण विभागाच्या परवानगी शिवाय तलावात बोटींगची सुविधा उपलब्ध करुन देण्यात येणार नाही. तसेच यांत्रिक बोटींचा वापर तलावात कुठल्याही प्रयोजनासाठी अनुज्ञेय असणार नाही. फक्त पॅडल बोटचा वापर अनुज्ञेय असेल.

२३.तलावात मासेमारी शक्यतो करण्यात येऊ नये. मासेमारी करावयाची झाल्यास फक्त मार्च, एप्रिल व मे या तीन महिन्यांसाठी परवानगी देण्यात यावी. अशावेळी १० इंच व त्यापेक्षा लहान आकाराच्या माशांना पकडण्याची मुभा देण्यात येऊ नये. स्थानिक परिस्थितीनुसार याबाबत प्रकल्प सनियंत्रण समिती वेळोवेळी निर्णय घेईल.

२४.योजनेवरील कामांसाठी राज्य शासनाच्या अनुदाना व्यतिरिक्त शासनाकडून, वित्तीय संस्थांकडून वा आणखी कोणत्याही संस्थांकडून प्राप्त निधी या योजने अंतर्गत खर्च झाल्याचे दर्शविण्यात येऊ नये. (No Overlapping of schemes)

२५. योजनेचे समन्वयन व पर्यवेक्षण करण्यासाठी भेट देणा-या राज्य शासनाच्या अधिका-यांस आवश्यक त्या सर्व प्रशासकीय सुविधा उपलब्ध करुन देणे आवश्यक असेल.

२६. योजनेंतर्गत शासनाच्या अनुदानातून तयार केलेली मालमत्ता, ज्या कामासाठी निर्माण केली आहे, त्याच कामासाठी वापरणे आवश्यक आहे व त्यासाठी ही मालमत्ता अभिलेखित करणे आवश्यक आहे.

२७. योजनेंतर्गत करण्यात येणा-या निरनिराळया कामांचे व समन्वयाचे काम राज्यस्तरावरील सनियंत्रण समितीव्दारे करण्यात येते. या समितीने कामाबाबत वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करणे आवश्यक असेल.

२८.योजनेंतर्गत ग्रामपंचायतीच्या होणा-या आस्थापनेवरील व लागणा-या मनुष्यबळावरील खर्च संबंधीत स्थानिक स्वराज्य संस्थेव्दारे करण्यात येईल. त्यासाठी या विभागाकडून अनुदान देण्यात येणार नाही.

२९. योजनेंतर्गत तलावातून काढण्यात येणा-या गाळांचे अभिलेख व छायाचित्रांसह पुरावे जिल्हा परिषदेने जतन करावेत. तसेच गाळाच्या विल्हेवाटीची अभिलेखामध्ये नोंद करुन ठेवावी.

३०.तलाव संवर्धनाबाबत मंजूर कामांमध्ये तलावातील गाळ काढणे व सिल्ट ट्रॅप लावण्याच्या कामाचा समावेश असल्यास, तलावाच्या गाळ काढण्याच्या कामाबरोबरच तसेच पावसाळयापूर्वी सिल्ट ट्रॅप लावण्याचे काम पूर्ण होणे आवश्यक आहे. अन्यथा तलावात पुन्हा गाळ जमा होऊ शकतो.

३१.तलावाच्या कामास सुरवात करण्यापूर्वीची छायाचित्रे विभागास सादर करावीत.

३२.राज्य शासनाने वेळोवेळी घालून दिलेल्या अटींचे व शर्तींचे पालन करणे जिल्हा परिषदेला बंधनकारक राहील.

३३.योजनेंतर्गत किती लोकांना रोजगार उपलब्ध झाला याची नोंद ठेवावी.

३४.योजना कालमर्यादेत पूर्ण करणे बंधनकारक असल्याने योजने करिता कोणतेही एस्कलेशन चार्जेस अनुज्ञेय नाहीत.

३५.योजनेंतर्गत मंजूर कामांच्या निविदा हया शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या विहित प्रक्रियेचा अवलंब करुन स्विकाराव्यात. तसेच प्रकल्पांतर्गत मंजूर किंमतीपेक्षा जास्त किंमतीच्या निविदा स्विकारण्यात येऊ नयेत.

३६. कॉन्ट्रॅक्टरने विहित वेळेत काम पूर्ण न केल्यास त्यांच्यावर दंड आकारण्याची तरतूद ठेवण्यात यावी.

३७.योजनांतर्गत झालेल्या सर्व खर्चाचा ताळमेळ वेळोवेळी अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई व तसेच महालेखाकार कार्यालय, मुंबई/ नागपूर यांच्या कार्यालयाशी घालण्याची जबाबदारी संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेची असेल.

३८.योजना पूर्ण झाल्यावर भविष्यात तलावाच्या उपयोगाबाबत व वापराबाबत किंवा तलावासंदर्भात कोणतीही नवीन कामे हाती घ्यावयाची झाल्यास त्यास प्रथम राज्य शासनाच्या पर्यावरण विभागाची मान्यता घेण्यात यावी.

३९.तलावाच्या क्षेत्राबाबत, मालकीबाबत, राबविण्यात येणा-या कामाच्या गुणवत्तेबाबत तसेच Surface floting wetland beds बाबत वा इतर संबंधित बाबींबाबत भविष्यात काही न्यायालयीन वा अन्य बाबी उदभवल्यास संबंधित स्थानिक स्वराज्य संस्था जबाबदार राहील.

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: CN = SURYAKANT KISAN NIKAM, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT
Date: 2022.03.29 12:50:18 +05'30'

**सु.कि.निकम**
**सह सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**महाराष्ट्र शासन**